# महाराष्ट्र विधानपरिषद

## पहिले (अर्थसंकल्प) अधिवेशन, २०१९

---

## अतारांकित प्रश्नोत्तरांची यादी

**प्रश्नांची एकूण संख्या - ५०**

---

### पुणे रेल्वे स्थानकाच्या पार्किंगकरीता नागरिकांची लूट होत असल्याबाबत

**(१) ४४७ (२८-०१-२०१५). श्री.अनिल भोसले, श्री.अब्दुल्लाखान दुर्राणी :** सन्माननीय **परिवहन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पुणे रेल्वे स्थानकाच्या पार्किंगकरीता दुचाकीसाठी ५ ऐवजी १० रूपये तर चार चाकी वाहनासाठी १० ऐवजी २० रूपये शुल्क आकारले जात आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, पार्किंग दरात वाढ करून पुणेकर नागरिकांची होत असलेली लूट थांबविणेबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिवाकर रावते (१८-११-२०१८) :** (१) पुणे रेल्वे स्थानकाच्या पार्किंगसाठी ४ वेगवेगळ्या ठिकाणी प्रिमियम व सामान्य दराने शुल्क आकारले जात आहे. रेल्वे बोर्डाच्या धोरणाप्रमाणे सदरहू दर आकारणी होत असून २ वर्षापासून दरवाढ करण्यात आलेली नाही.

(२) व (३) जादा दर आकारणीसंदर्भात तक्रार आल्यास रेल्वेच्या विभागीय प्राधिकाऱ्यांमार्फत कार्यवाही केली जात आहे.

---

## राज्यातील शाळेत पूर्णवेळ ग्रंथपाल व प्रयोग शाळा सहाय्यक पदे भरण्याबाबत

**(२) २८८९ (२०-०४-२०१५). डॉ.सुधीर तांबे, श्री.सतिश चव्हाण, श्री.विक्रम काळे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील अनेक शाळेत पूर्णवेळ ग्रंथपाल व प्रयोग शाळा सहाय्यक ही पदे भरली नसल्याचे माहे जानेवारी, २०१५ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) तसेच शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना लागू केलेल्या आकृतिबंध शासन रद्द करून चिळणूकर समितीच्या अहवालनुसार पदे भरण्यास शासन परवानगी देणार आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) अद्याप, उपरोक्त प्रकरणी कोणतीच कार्यवाही करण्यात आली नसल्यास त्याची सर्वसाधारण कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१५-१२-२०१८) :** (१), (२), (३) व (४) राज्यातील खाजगी अनुदानित माध्यमिक शाळांमधील पूर्णवेळ ग्रंथपाल व प्रयोग शाळा सहाय्यक पदांचा आकृतिबंध निश्चित करण्याची कार्यवाही अंतिम टप्प्यात आहे.

---

## माध्यमिक व उच्च माध्यमिकच्या पायाभूतपेक्षा वाढीव पदांच्या मान्यतेच्या प्रस्तावाबाबत

**(३) ८०७७ (०४-०८-२०१५). श्री.नागोराव गाणार :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) माध्यमिक व उच्च माध्यमिकच्या सन २०१३-१४ अखेरच्या वाढीव पदांचे प्रस्ताव मंजूरीसाठी शिक्षण संचालनालयाकडून शासनास केंव्हा प्राप्त झाले आहेत,
(२) सन २०११-१२, २०१२-१३ व २०१३-१४ च्या उच्च माध्यमिकच्या पायाभूतपेक्षा वाढीव पदांची संख्या वर्षनिहाय किती आहे,
(३) सन २०१३-१४ अखेर माध्यमिकच्या पायाभूतपेक्षा वाढीव प्रलंबित पदांची संख्या किती आहे,
(४) पायाभूतपेक्षा वाढीव पदांची माहिती व प्रस्ताव दरवर्षी प्राप्त होणे अपेक्षित असतानाही वेळेवर प्रस्ताव न पाठविणाऱ्या अधिकाऱ्यांवर शासनाने काय कारवाई केली वा करण्यात येत आहे ?

**श्री.विनोद तावडे (१५-१२-२०१८) :** (१), (२), (३) व (४) सन २००३-०४ ते २०१०-११ पर्यंतची उच्च माध्यमिक मधील ९३५ वाढीव पदांपैकी सर्व पदांवर नियुक्ती न केल्यामुळे वित्त विभाग, शासन निर्णय, दिनांक ०९/०४/२०१८ अन्वये ४२८ पदे व्यपगत केली आहेत.

माध्यमिक मधील वाढीव पदांबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन आहे.

---

## सामाजिक न्याय विभागातील विशेष शाळांच्या वेतन अनुदानाचे लेखाशीर्ष बदलण्याबाबत

**(४) १५०८३ (२७-०४-२०१६). श्री.कपिल पाटील :** सन्माननीय **सामाजिक न्याय मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) सामाजिक न्याय विभागाशी संबंधित विशेष शाळांमधील शिक्षक व कर्मचाऱ्यांचे वेतन सहाय्यक अनुदान लेखाशिर्षाऐवजी वेतन अनुदान लेखाशिर्षा अंतर्गत काढण्याची मागणी या शिक्षक व कर्मचाऱ्यांकडून होत आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, संबंधित शाळांना माध्यमिक दर्जा देण्याबाबत शासनाने काय कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.राजकुमार बडोले (२८-१२-२०१८) :** (१) होय.
(२) अपंग शाळा संहिता सन १९९७ मधील दोन नुसार अपंगाच्या विशेष शाळांच्या माध्यमिक विभाग अस्तित्वात आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## कला, क्रीडा व कार्यानुभव शिक्षकांच्या नियुक्तीस बंदी घालणारा व अतिथी निर्देशांक नेण्याबाबत शासनाने काढलेला अध्यादेश तात्काळ रद्द करण्याबाबत

**(५) १५१८८ (२९-०४-२०१६). श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले : तारांकित प्रश्न क्रमांक १२४३९ ला दिनांक ७ डिसेंबर, २०१५ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील प्राथमिक, उच्च प्राथमिक शाळांमध्ये यापुढे कला, क्रीडा व कार्यानुभव शिक्षकांच्या नियुक्त्या रद्द करुन त्याऐवजी अतिथी निदेशक नेमण्याबाबत शासनाने दिनांक ७ ऑक्टोबर, २०१५ रोजी वा त्यासुमारास शालेय शिक्षण विभागामार्फत अध्यादेश काढला, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, अध्यादेश राज्यातील हजारो कला, क्रीडा, कार्यानुभव शिक्षकांना बेरोजगार करणार असल्याने तो तात्काळ रद्द करण्याची मागणी नागपूर जिल्हा कला अध्यापक संघ व महाराष्ट्र राज्य क्रीडा व शारिरीक शिक्षण शिक्षक महासंघ नागपूर विभाग समन्वय समितीतर्फे तसेच नागपूर विभागाच्या लोकप्रतिनिधींनी शासनास दिनांक ८ डिसेंबर, २०१५ रोजी पत्र देऊन विनंती केली, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१५-१२-२०१८) :** (१) अंशत: खरे आहे.
(२) व (३) मा.उच्च न्यायालय खंडपीठ, औरंगाबाद यांनी याचिका ११७७१/२०१५ मध्ये दिनांक ६/६/२०१७ रोजी दिलेल्या आदेशानुसार शासन स्तरावरुन दिनांक १/९/२०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये कार्यवाही सुरु आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील शिक्षक-शिक्षकेतर कर्मचारी व संस्थाचालक यांचे प्रलंबित प्रश्नांवर करावयाची कार्यवाही

**(६) १५५५२ (२९-०४-२०१६). डॉ.सुधीर तांबे, श्री.सतेज ऊर्फ बंटी पाटील, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यात कनिष्ठ महाविद्‌यालयातील शिक्षक, शिक्षकेतर, कर्मचारी आणि विनाअनुदानित कनिष्ठ महाविद्‌यालयांचे अनेक प्रलंबित प्रश्न शासनाने मार्गी न लावता ते प्रलंबित ठेवल्याने या विरोधात राज्यातील शिक्षक शिक्षकेतर कर्मचारी व संस्थाचालक संघटनानी शासन विरोधात आंदोलन करण्याची तयारी चालविली असल्याचे माहे जानेवारी, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उपरोक्त शिक्षक शिक्षकेतर कर्मचारी व संस्था चालक यांचे प्रलंबित प्रश्न मार्गी लावण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०५-१२-२०१८) :** (१) व (२) कनिष्ठ महाविद्‌यालयीन शिक्षकांचे मागण्यांबाबत मा.मंत्री, शालेय शिक्षण व मा.मंत्री, वित्त यांचेकडे झालेल्या बैठकीमध्ये काही मागण्या मान्य करण्यात आलेल्या असून उर्वरित मागण्यांबाबत वित्त विभागासोबत बैठक घेऊन निर्णय करण्याचे ठरले आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील माध्यमिक विभागात संगणकीय अनुसूचितनुसार पदसंख्या भरण्याबाबत

**(७) २०४३७ (२४-०७-२०११). डॉ.सुधीर तांबे** : सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात माध्यमिक विभागात संगणकीय अनुसूचिनुसार निर्माण झालेल्या पदसंख्या भरण्याबाबत शासनाने माहे जून, २०११ मध्ये वा त्यादरम्यान कोणता निर्णय घेतला वा घेण्यात येत आहे,

(२) तसेच एकूण किती पदे निर्माण झाली आहेत,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१५-१२-२०१८)** : (१), (२) व (३) राज्यातील माध्यमिक शाळांमधील शिक्षकेतर पदांचा आकृतिबंध निश्चित करण्याचा प्रस्ताव उच्चस्तरीय सचिव समितीच्या मान्यतेसाठी सादर करण्यात आला आहे.

शिक्षकांची पदे "पवित्रा" प्रणाली मार्फत भरण्यात येणार आहेत.

---

## यवतमाळ जिल्हयात शिक्षक आणि कर्मचाऱ्यांचे कल्याण निधीत गैरव्यवहार झाल्याबाबत

**(८) २०८७३ (२३-०८-२०१६). श्री.ख्वाजा बेग, श्री.रामराव वडकुते, श्री.किरण पावसकर, श्री.अनिल भोसले, श्री.आनंद ठाकूर, श्री.हेमंत टकले** : सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) यवतमाळ जिल्हयात सन १९९० पासून शिक्षक आणि कर्मचाऱ्यांच्या वेतनातून भविष्य निर्वाह निधीची कपात करण्यात आली असून कर्मचाऱ्यांच्या वेतनातून कपात केलेली रक्कम व जमा झालेली रक्कम यामध्ये गैरव्यवहार झाल्याचे माहे एप्रिल, २०१६ च्या तिसऱ्या सप्ताहात निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्नुसार गैरव्यवहार करणाऱ्यांविरुध्द कारवाई करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०५-१२-२०१८) :** (१) हे खरे नाही.
(२) व (३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## आंबेटेंबे (ता.मुरबाड, जि.ठाणे) येथील भिमाई स्मारकास निधी उपलब्ध करुन देण्याबाबत

**(९) २१०९५ (१९-०८-२०१६). श्री.शरद रणपिसे :** सन्माननीय **सामाजिक न्याय मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यात डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांची शतकोत्तर रौप्य महोत्सवी जयंती साजरी होत असताना त्यांचे आजोळ असलेले आंबेटेंबे (ता.मुरबाड, जि.ठाणे) येथील भिमाई स्मारक दुर्लक्षित असल्याचे माहे एप्रिल, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, या स्मारकाला निधी उपलब्ध करुन देऊन ते उभारण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.राजकुमार बडोले (२८-११-२०१८) :** (१) व (२) भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या १२५ व्या जयंती वर्षानिमित्त अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांसाठी ऐतिहासिक व सांस्कृतिकदृष्ट्या महत्वाच्या ठिकाणे/स्थळांचा विकास करण्याच्या दिनांक १४/३/२०१८ च्या शासन निर्णयान्वये आंबेटेंबे (ता.मुरबाड, जि.ठाणे) येथील भिमाई स्मारकाचे बांधकाम करणेबाबतचा निर्णय घेण्यात आला असून विभागाच्या दिनांक ३/८/२०१८ च्या शासन निर्णयान्वये सदरील कामाकरीता निधी उपलब्ध करून देण्यात आला आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील वसतिगृहांच्या अनुदानात कपात केल्याबाबत

**(१०) २१५८६ (१९-०८-२०१६). श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले, श्री.गिरीशचंद्र व्यास :** सन्माननीय **सामाजिक न्याय मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात शासनाने मागील ५ वर्षात अनुदानित वसतिगृहांच्या अनुदानात कपात केल्याने अनेक वसतिगृह बंद पडले आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, किती वसतिगृह बंद पडली आहेत, बंद वसतिगृह इतर स्वयंसेवी संस्थांना चालविण्यास शासन परवानगी देणार आहे काय,
(३) नसल्यास, वसतिगृहांना अनुदान नियमितपणे देणे तसेच वसतिगृहातील अधिक्षक, स्वयंपाकी व चौकीदार यांना शासन नियमानुसार वेतन देण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.राजकुमार बडोले (०६-१२-२०१८) :** (१) व (२) नाही.

अनुदानित वसतिगृहांच्या अनुदानात शासनाने कोणतीही कपात केलेली नाही.

परंतु व्यवस्थापनाती अनियमितता वा अन्य कारणास्तव काही वसतिगृह बंद करण्यात आलेली असून, अशी बंद पडलेली अनुदानित वसतिगृहे इतर स्वयंसेवी संस्थांना हस्तांतर व स्थलांतर करण्याबाबत शासनाने दिनांक २८/०६/२०१८ अन्वये धोरण निश्चित केलेले आहे. त्यानुसार जाहिरातीद्वारे यासाठी अर्ज मागवून पात्र संस्थाना सदर अनुदानित वसतिगृह हस्तांतर व स्थलांतर करण्याचे प्रस्तावित आहे.
(३) या वसतिगृहांना अनुदान तसेच वसतिगृहातील कर्मचाऱ्यांचे मानधन नियमितपणे अदा करण्यात येत आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## हिंगोली येथील शिक्षकांच्या विविध समस्यांबाबत

**(११) २२३३० (२३-०८-२०१६). श्री.अमरनाथ राजूरकर, ॲड.रामहरी रुपनवर :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) हिंगोली येथील शिक्षकांचा पगार वर्षाभरात कधीच वेळेवर होत नाही तो वेळेवर करण्यासाठी शिक्षणाधिकारी यांना आदेश व्हावेत तसेच संचमान्यता तात्काळ पूर्ण करुन समायोजन, बदल्या वेळेवर करण्यात याव्यात इत्यादी

मागण्याकडे शासनाचे लक्ष वेधून घेण्यासाठी महाराष्ट्र राज्य प्राथमिक शिक्षक संच संघ जिल्हा शाखेच्यावतीने सचिव, शालेय शिक्षण विभाग यांना निवेदन देण्यात आले असल्याचे माहे मे, २०१५ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर शिक्षकाच्या मागण्यांवर शासनाने निर्णय घेऊन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०५-१२-२०१८) :** (१) व (२) शिक्षकांचे वेतन वेळेवर अदा करण्यात येत आहे. संचमान्यता पूर्ण करण्यात आली असून संचमान्यतेप्रमाणे समायोजन व बदल्याची कार्यवाही पूर्ण करण्यात आली आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## अतिरिक्त शिक्षकांचे समायोजनाबाबत

**(१२) २२५१२ (१९-०४-२०१७). श्री.दत्तात्रय सावंत, श्री.श्रीकांत देशपांडे :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१)सोलापूर जिल्ह्यातील माध्यमिक शिक्षक सन २०१२ च्या अगोदर पासून अतिरिक्त असून त्यांचे समायोजन झाले नाही, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, अतिरिक्त शिक्षकांचे समायोजन झाले नसतानाही शेकडो शिक्षकांच्या पदांना नव्याने मान्यता दिल्या, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, तालुकानिहाय जिल्ह्यात किती शिक्षकांच्या पदांना मान्यता देण्यात आली आहेत,
(४) तसेच अतिरिक्त शिक्षकांचे समायोजन करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे ?

**श्री.विनोद तावडे (१५-१२-२०१८) :** (१), (२), (३) व (४) अतिरिक्त शिक्षकांच्या समायोजनाबाबत शासन पत्र दिनांक ०४/०९/२०१८ नुसार कार्यवाही करण्यात येत आहे.

---

## शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या आकृतिबंधाबाबत

**(१३) २२५२१ (२३-०८-२०१६). श्री.दत्तात्रय सावंत, श्री.श्रीकांत देशपांडे : तारांकित प्रश्न क्रमांक १४९६२ ला दिनांक २२ मार्च, २०१६ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील माध्यमिक शाळेत काम करणारे शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या आकृतिबंधाबाबत अभ्यास करण्यासाठी शासनाने समिती गठीत केलेली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या समितीने आपला अहवाल शासनास सादर केला आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, या अहवालाची अंमलबजावणी करण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची करणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१५-१२-२०१८) :** (१) होय.

(२) होय.

(३) सदर अहवालाच्या अनुषंगाने आकृतिबंध निश्चित करावयाची बाब अंतिम टप्प्यात आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## परभणी जिल्ह्यातील मजुर सहकारी संस्थांना नियमबाह्यरितीने काम वाटप करण्यात येत असल्याबाबत

**(१४) २४५०४ (१६-१२-२०१६). श्री.अब्दुल्लाखान दुर्राणी, श्री.धनंजय मुंडे :** सन्माननीय **सहकार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) परभणी जिल्ह्यातील मजुर सहकारी संस्थांना काम वाटप करताना नियम भंग होत असल्याने सदर सहकारी संस्थांनी जिल्हाधिकारी, परभणी यांच्याकडे माहे मे, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान लेखी आक्षेप नोंदविला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी जिल्हाधिकारी, परभणी यांच्याकडून कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुभाष देशमुख (१९-१२-२०१८) :** (१) नाही.

परभणी जिल्हा मजुर सहकारी संस्थांचे फेडरेशन मर्या.परभणी यांनी दिनांक १३/०५/२०१६ रोजी सर्व काम उपलब्ध करुन देणाऱ्या यंत्रणांना निवेदन दिलेले असून, त्याची प्रत जिल्हाधिकारी, परभणी यांनी दिली आहे. मात्र, सदर निवेदन हे जिल्ह्यातील मजुर सहकारी संस्थांना काम वाटप करताना नियमभंग होत असलेबाबत नसून, सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय क्र.सीएटी-०१/२०१५/प्र.क्र.२०/इमा/०२/ दिनांक २४/०४/२०१५ चे तंतोतंत पालन करणेबाबत आहे.
(२) सदर निवेदन हे काम उपलब्ध करुन देणाऱ्या यंत्रणाबाबत असल्याने त्याबाबत उपजिल्हाधिकारी, परभणी यांनी कामे उपलब्ध करुन देणाऱ्या यंत्रणांना सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णयानुसार कार्यवाही करण्याच्या सूचना दिल्या आहेत.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मौदा (जि.नागपूर) येथील प्राथमिक स्वास्थ केंद्राचे स्थलांतरण नवीन ग्रामीण रुग्णालयाच्या इमारतीत करण्याबाबत

**(१५) २५२१९ (१६-१२-२०१६). प्रा.अनिल सोले :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मौदा (जि.नागपूर) येथे नवीन ग्रामीण रुग्णालयाच्या इमारतीचे बांधकाम होवूनही मौदा प्राथमिक स्वास्थ केंद्राचे नवीन इमारतीत स्थलांतरण झाले नसल्याचे दिनांक २८ जुलै, २०१६ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर प्राथमिक स्वास्थ केंद्राचे स्थलांतरण नविन इमारतीत त्वरीत करण्यासाठी शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. दीपक सावंत (२२-११-२०१८) :** (१) हे खरे आहे.
(२) ग्रामीण रूग्णालय, मौदाचे बांधकाम पूर्ण झाले असून उपकरणे व साधन सामुग्री पुरविण्याची कार्यवाही सुरू असल्याने व मंजूर १५ पदांपैकी तांत्रिक पदे भरण्यात न आल्याने ग्रामीण रूग्णालय पूर्ण क्षमतेने कार्यान्वित झाले नाही. यास्तव मौदा येथील प्रा. आ. केंद्राचे अद्याप स्थलांतर करण्यात आलेले नाही. तात्पुरती व्यवस्था म्हणून दिनांक १३/०८/२०१६ पासून प्राथमिक आरोग्य केंद्र मौदा हे ग्रामीण रूग्णालयाच्या नवीन इमारतीत कार्यान्वित करण्यात आले आहे. ग्रामीण रूग्णालय पूर्णत: कार्यान्वित होताच सदरचे प्राथमिक आरोग्य केंद्र नवीन ठिकाणी येथे स्थलांतरीत करण्याबाबत कार्यवाही करण्यात येईल.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यात सावकारी कायद्याची अंमलबजावणी करण्याबाबत

**(१६) २५६२३ (१६-१२-२०१६). डॉ.(श्रीमती) नीलम गोऱ्हे :** सन्माननीय **सहकार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील परवानाधारक सावकारांनी किती कर्जवाटप केले, ते कोणत्या दराने दिले, त्यापैकी शेतकऱ्यांनी किती रक्कम भरली आणि थकबाकी किती आहे इ. वित्तीय ताळेबंद शासनाकडे सहामाही वा वार्षिक मुदतीत सादर करणे बंधनकारक आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, परवानाधारक सावकार अशाप्रकारचा ताळेबंद शासनास सादर करीत नाही, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, सावकारी प्रतिबंधक कायदयाची कठोर अंमलबजावणी करण्यासाठी, बेकायदा सावकारी तसेच सावकारांच्या जाचातून जनतेची सुटका करण्याकरीता शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुभाष देशमुख (२८-०१-२०१९) :** (१) होय.
(२) नाही.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील शासकीय वसतिगृहात विद्यार्थ्यांना प्रवेश मिळण्याबाबत

**(१७) २८४५५ (१४-०४-२०१७). श्री.ख्वाजा बेग, श्री.हेमंत टकले, श्री.किरण पावसकर, श्री.आनंद ठाकूर, श्री.रामराव वडकुते, श्री.अनिल भोसले, श्री.प्रकाश गजभिये, श्री.सतिश चव्हाण, श्री.अब्दुल्लाखान दुर्राणी :** सन्माननीय **सामाजिक न्याय मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील शासकीय वसतिगृहात इतर मागासवर्ग, विमुक्त जाती व भटक्या जमातीच्या विद्यार्थ्यांसाठी १० टक्के जागा राखीव ठेवल्याने इतर समाजाचे विद्यार्थी वसतिगृह प्रवेशापासून वंचित रहात असल्याचे दिनांक ३१ डिसेंबर, २०१६ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तदनुसार कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.राजकुमार बडोले (०६-१२-२०१८) :** (१) व (२) नाही.

सामाजिक न्याय विभागाच्या अधिपत्याखाली कार्यरत असलेल्या वसतिगृहांमध्ये सर्व मागास प्रवर्गातील विद्यार्थ्यांना प्रवेश देण्यात येतो.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## डॉ.बाबासाहेब आंबेडकर समाज भूषण पुरस्कार प्राप्त व्यक्तींना महात्मा फुले जन आरोग्य योजनेचा लाभ मिळणेबाबत

**(१८) २९३२४ (१२-०४-२०१७). श्रीमती विद्या चव्हाण : तारांकित प्रश्न क्रमांक २४८३२ ला दिनांक ५ डिसेंबर, २०१६ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **सामाजिक न्याय मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात सन २०१७ मध्ये किती व्यक्तींना डॉ. बाबासाहेब आंबेडकर समाज भूषण पुरस्कार देण्यात आले आहेत,
(२) असल्यास, समाज भुषण पुरस्कार प्राप्त व्यक्तींना महात्मा फुले जन आरोग्य योजनेचा लाभ देण्याबाबतचा प्रस्ताव शासनस्तरावर विचाराधीन आहे, हे खरे आहे काय,
(३) असलेल्या, सदर प्रस्तावाबाबत शासनाने कोणता निर्णय घेतला वा घेण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.राजकुमार बडोले (२२-११-२०१८) :** (१) सन २०१७-१८ या वर्षी एकूण ६२ व्यक्तींना डॉ. बाबासाहेब आंबेडकर समाज भूषण पुरस्कार देण्यात आला आहे.
(२) व (३) होय, हे खरे आहे. डॉ. बाबासाहेब आंबेडकर समाज भूषण पुरस्कार प्राप्त व्यक्तींना महात्मा फुले जन आरोग्य योजनेचा लाभ देण्याचा प्रस्ताव वित्त विभागाच्या मान्यतेसाठी सादर करण्यात आला असून, त्यावर वित्त विभागाने उपस्थित केलेल्या त्रुटींच्या अनुषंगाने आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांचेकडून माहिती मागविण्यात आली आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## कापडे ते कामथे (ता.पोलादपूर, जि.रायगड) येथील रस्त्याची दूरवस्था झाल्याबाबत

**(१९) ३०७११ (१७-०४-२०१७). श्री.सुजितसिंह ठाकूर :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) कापडे ते कामथे (ता.पोलादपूर, जि.रायगड) येथील रस्त्यांवर खड्डे पडल्याने रस्त्याची दूरवस्था झाल्याचे माहे जानेवारी, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, ५ वर्षापूर्वी पंतप्रधान ग्रामसडक योजनेतून रुपये पाच कोटी खर्च करुनही कापडे ते कामथे रस्त्याचे काम पूर्ण झालेले नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, सदर प्रकरणी शासनाने चौकशी करुन रस्ता दुरुस्ती करण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (२२-०९-२०१७) :** (१) अंशतः खरे आहे.

सदर रस्ता पूर्ण होऊन ६ वर्ष ४ महिने इतका कालावधी झाला आहे. कापडे ते कामथे रस्ता हा रायगड जिल्ह्यातील दरवर्षी अतिवृष्टी होणाऱ्या (सरासरी ३७१२ मी.मी.) पोलादपूर तालुक्यातील रस्ता आहे. सन २०१६ च्या पावसाळ्यात पोलादपूर तालुक्यात ४१७० मी.मी. इतका पाऊस झाला आहे. त्यामुळे या रस्त्यावर पावसाळ्यात काही प्रमाणात खड्डे पडले होते.
(२) नाही, हे खरे नाही. सदर रस्त्याच्या दर्जोन्नतीकरणाचे काम दिनांक २६/१२/२०१० रोजी पूर्ण झाले आहे.
(३) सदर रस्त्यावरील सा.क्र. ६/५०० ते १८/६०० मधील खड्डे मार्च, २०१७ पूर्वी भरण्यात आले आहेत.

तसेच विशेष दुरुस्ती कार्यक्रमांतर्गत सन २०१६-१७ मध्ये या रस्त्याचे सा.क्र. ०/०० ते ४/०० मधील रस्त्याचे पृष्ठभाग नुतनीकरण करणे व सा.क्र. ४/०० ते ६/५०० कि.मी. मधील खड्डे भरण्याचे काम मंजूर असून प्रगतीत आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यात उर्दु माध्यमाच्या विद्यार्थ्यांना उर्दु भाषेतून प्रश्नपत्रिका देण्याबाबत

**(२०) ३३९७५ (११-०८-२०१७). श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.दत्तात्रय सावंत :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यामध्ये +२ स्तरावर उच्च माध्यमिक व्यवसाय अभ्यासक्रमांतर्गत (एम.सी.व्ही.सी.) उर्दु माध्यमाच्या वर्ग १२ वी च्या विद्यार्थ्यांना शालांत परीक्षेमध्ये प्रश्नपत्रिका उर्दु माध्यमातून न देता मराठी किंवा इंग्रजी या भाषेतून दिल्या जातात, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उर्दू माध्यमाच्या विद्यार्थ्यांना मराठी किंवा इंग्रजी भाषा अवगत नसल्यामुळे त्याचा परिणाम त्यांच्या शैक्षणिक गुणावर होत असून उर्दु माध्यमाच्या विद्यार्थ्यांना अवगत असलेली भाषा उर्दु भाषेतून वर्ग १२ वी ची प्रश्नपत्रिका देण्याविषयीची मागणी अमरावती विभाग, शिक्षक आघाडीच्यावतीने निवेदनाद्वारे प्रधान सचिव, शालेय शिक्षण विभाग यांच्याकडे दिनांक ०६ फेब्रुवारी, २०१५ रोजी वा त्यासुमारास केली, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१९-११-२०१८) :** (१) हे खरे आहे.
(२) व (३) व्यावसायिक विषय (एम.सी.व्ही.सी) घेणाऱ्या इ.१२ वी च्या विद्यार्थ्यांकरीता इंग्रजी भाषा अनिवार्य असल्याने इंग्रजी भाषा सर्व विद्यार्थ्यांना अवगत असते. तसेच विद्यार्थ्यांस इंग्रजी, मराठी, गुजराती, कन्नड, उर्दू व हिंदी या ६ भाषांपैकी कोणत्याही भाषेतून उत्तरे लिहिण्याची परवानगी आहे. यामुळे विद्यार्थ्यांच्या गुणांवर परिणाम झालेला नाही.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यात ११ वी प्रवेश ऑनलाईन पध्दती बंद करण्याबाबत

**(२१) ३४०९१ (१८-०८-२०१७). श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.दत्तात्रय सावंत :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) दिनांक १० जून, २०१६ ला शालांत प्रमाणपत्र परीक्षेच्या निकालापासून सुरु झालेली ११ वी ऑनलाईन प्रवेश प्रक्रिया दिनांक २१ ऑक्टोबर, २०१६ पर्यंत सुरूच होती, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, प्रत्येक शाळेत, कनिष्ठ महाविद्यालयात अथवा पालकांच्या घरी इंटरनेट सुविधा उपलब्ध नसल्याने सायबर कॅफेत पैसे भरुन रांगा लावणे, ३५ कनिष्ठ महाविद्यालयांचा विकल्प देतांना गोंधळ होणे,

वेटरमेंटच्या प्रत्येक संधीच्या वेळी रुपये १५० चा भुर्दंड सोसणे आदी त्रासातून विद्यार्थ्यांना जावे लागत असून ऑनलाईन प्रवेशाची अंतिम यादी दिनांक २१ ऑक्टोबर, २०१६ रोजी दिल्यामुळे विद्यार्थ्यांचे शैक्षणिक नुकसान झाले, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन विद्यार्थी व पालकांना मनस्ताप देणारी ११ वी प्रवेश ऑनलाईन पध्दती बंद करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१९-११-२०१८) :** (१) हे खरे आहे.

(२) सन २०१६-१७ च्या प्रवेश प्रक्रियेमध्ये आलेल्या अडचणी विचारात घेऊन दिनांक ७ जानेवारी, २०१७ च्या शासन निर्णयान्वये सन २०१७-१८ च्या प्रवेश प्रक्रियेमध्ये सुधारणा करण्यात आली आहे.

(३) इ.११ वी चे प्रवेश गुणवत्तेनुसार व पारदर्शकतेने करावे, असे मा.मुंबई उच्च न्यायालयाचे निर्देश आहेत. मा.मुंबई उच्च न्यायालयाचे निर्देश विचारात घेऊन, सन २००९ पासून मुंबई महानगर क्षेत्रामध्ये इ.११ वी ची प्रवेश प्रक्रिया ऑनलाईन पध्दतीने करण्यात येत आहे. सदर प्रक्रिया पूर्ण करताना आलेल्या अडचणी विचारात घेऊन पुढील वर्षीच्या प्रवेश प्रक्रियेमध्ये आवश्यक सुधारणा करण्यात येतात.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील वाळू तस्करांवर कारवाई करण्याबाबत

**(२२) ३४६५१ (०३-०४-२०१८). श्री.धनंजय मुंडे :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात लिलावापेक्षा कित्येक पट जास्त वाळू उपसा होत असल्याच्या तक्रारी सातत्याने करण्यात येत आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, महसूल, पोलीस यंत्रणा व खनिकर्म विभागाच्या अधिकाऱ्यांचे आर्थिक हितसंबंध असल्यामुळे वाळू तक्सरांवर कारवाई करण्यात येत नाही, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (०२-०१-२०१९) :** (१) राज्यात धुळे, जळगांव, भंडारा, जालना, परभणी, लातूर व नांदेड जिल्ह्यात मंजूर वाळू लिलावापेक्षा अधिक वाळू उपसा झाल्याच्या तक्रारी प्राप्त झाल्या आहेत.
(२) अशी बाब निदर्शनास आली नाही.
(३) मंजूर वाळू लिलावापेक्षा अधिक वाळू उत्खनन करणाऱ्या वाळू लिलावधारकाविरुध्द काही ठिकाणी दंडात्मक कारवाई करण्यात आली आहे. तर काही ठिकाणी वाळू लिलावधारकाचा वाळूघाट बंद करण्यात आला आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील वैद्यकिय अधिकाऱ्यांची अस्थायी पदे कायमस्वरूपी भरण्याबाबत

**(२३) ३४८२४ (०२-०१-२०१८). श्री.ख्वाजा बेग, श्री.आनंद ठाकूर :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील ७३८ वैद्यकिय अधिकाऱ्यांची पदे अस्थायी आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर पदे रिक्त ठेवण्याची कारणे काय आहेत,
(३) तसेच रुग्णांना पूर्ण क्षमतेने आरोग्य सेवा मिळावी म्हणून वैद्यकिय अधिकाऱ्यांची अस्थायी पदे कायमस्वरुपी भरणेबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. दीपक सावंत (०३-०१-२०१९) :** (१) राज्यातील दुर्गम, आदिवासी व नक्षलग्रस्त भागात ७३८ (बी.ए.एम.एस.) वैद्यकीय अधिकारी हे वर्षानुवर्षे अस्थायी वैद्यकीय अधिकारी म्हणून कार्यरत आहेत. सदर ७३८ अस्थायी वैद्यकीय अधिकारी (गट-ब) या संवर्गात रिक्त असलेल्या नियमित पदावर कायमस्वरुपी एकवेळचे विशेष बाब म्हणून दिनांक २९/०८/२०१७ रोजीच्या मा.मंत्रिमंडळ बैठकीत मान्यता देण्यात आली असून, अस्थायी वैद्यकीय अधिकारी यांच्या समावेशनाबाबतची अधिसूचना निर्गमित करावयाची कार्यवाही अंतिम टप्प्यात आहे.

(२) नियुक्ती प्रक्रियेदरम्यान नियमित वैद्यकीय अधिकारी यांची पदे उपलब्ध होत नसल्याने सदरहू पदे रिक्त आहेत.

(३) वैद्यकीय अधिकारी, गट-अ संवर्गाची रिक्त पदे कायमस्वरुपी भरणेबाबत राज्यस्तरावरुन वैद्यकीय अधिकाऱ्यांच्या ७२३ रिक्त पदांची जाहिरात दिनांक १३/०७/२०१८ रोजी प्रसिध्द करण्यात आली असून, त्यानुसार रिक्त पदे भरण्याची कार्यवाही सुरु आहे.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांचे लंडन मधील स्मारकाचे काम प्रलंबित असल्याबाबत

**(२४) ३६०६७ (०३-०१-२०१८). श्री.हेमंत टकले, श्री.किरण पावसकर, श्री.धनंजय मुंडे, श्रीमती विद्या चव्हाण, श्री.जगन्नाथ शिंदे :** सन्माननीय **सामाजिक न्याय मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांनी लंडनमध्ये वास्तव्य केलेल्या घराचे स्मारकात रुपांतर करण्याचा निर्णय मागील ३ वर्षापूर्वी शासनाने घेतला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर स्मारकाचे काम प्रलंबित आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, त्याची कारणे काय आहेत तसेच सदर स्मारकाचे काम लवकरात लवकर पूर्ण होण्यासाठी शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.राजकुमार बडोले (२७-११-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे
(२) व (३) सदर घराचे/ स्मारकाचे नुतनीकरणासाठी विभागाच्या दिनांक ३१/१/२०१७ व दिनांक १५/११/२०१७ च्या शासन निर्णयान्वये रक्कम अदा करण्यात आली असून सध्या काम प्रगतीपथावर सुरू आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## सर्व शिक्षा अभियान योजनेंतर्गत कार्यरत असणाऱ्या कर्मचाऱ्यांना शालेय शिक्षण विभागात कायम करण्याबाबत

**(२५) ३६०७९ (०३-०१-२०१८). ॲड.निरंजन डावखरे :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) केंद्र शासनामार्फत राज्य शासनाच्या सहभागातून सन २००१ पासून राज्यात सर्व शिक्षा अभियान योजना सुरु केली असून ही योजना महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषदेमार्फत राबविण्यात येत आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सर्व शिक्षा अभियान योजनेंतर्गत राज्यस्तर, जिल्हास्तर व तालुकास्तरावर विविध पदावर बहुतांशी कर्मचारी मागील १० ते १७ वर्षापासून कार्यरत असून त्यांची शासकीय अथवा खाजगी नोकरीसाठी आवश्यक असणारी वयोमर्यादा ओलांडून गेल्यामुळे त्यांना अन्य नोकरी मिळणे दुरापास्त आहे, हे खरे आहे काय,
(३) असल्यास, सर्व शिक्षा अभियान योजनेंतर्गत काम करणाऱ्या ६११० कर्मचाऱ्यांना विनाशर्त त्या योजनेमध्ये किंवा शासकीय सेवेमध्ये सामावून घेण्याबाबतचा प्रस्ताव राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र राज्य प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांनी प्रधान सचिव, शालेय शिक्षण विभाग यांचेकडे दिडवर्षापुर्वीच पाठविला असल्याचे दिनांक १४ जून, २०१७ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सर्व शिक्षा अभियानांतर्गत कर्मचाऱ्यांची झालेली सेवा व नोकरी योग्य ओलांडलेली वयोमर्यादा विचारात घेता, सदरहू प्रस्तावाच्या अनुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१८-१२-२०१८) :** (१) होय.
(२), (३) व (४) अंशत: खरे आहे. सर्व शिक्षा अभियानांतर्गत कार्यरत ६११० कंत्राटी कर्मचाऱ्यांना शासकीय सेवेत सामावून घेण्याबाबतचा प्रस्ताव प्राप्त झाला असून शासनस्तरावर कार्यवाही सुरु आहे.
(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मौजे वाडातर (ता.देवगड, जि.सिंधुदुर्ग) येथील अनधिकृत बांधकाम निष्कासित करण्याबाबत

**(२६) ३६७५४ (०३-०१-२०१८). श्रीमती विद्या चव्हाण :** सन्माननीय **पर्यावरण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मौजे वाडातर (ता.देवगड, जि.सिंधुदुर्ग) येथील सर्वे नं. २६ हिस्सा नं. १/७ ही जागा सी.आर.झेड. अंतर्गत येत असून वाडातर येथील भाबल वाडातर सेवा संस्थेने अनधिकृत बांधकाम केलेले असून सदर अनधिकृत बांधकाम करु नये असे तहसिलदार यांनी दिनांक २४ एप्रिल, २०१५ रोजी भाबल वाडातर सेवा संस्थेवर नोटीस बजावूनही अनधिकृत बांधकाम करण्यात आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उपविभागीय अधिकारी (महसूल) कणकवली, जि.सिंधुदुर्ग यांनी दिनांक ३ जुलै, २०१७ रोजी भाबल वाडातर सेवा संस्थेवर नोटीस पाठवूनही सदर अनधिकृत बांधकाम निष्कासित करण्याबाबत कारवाई झालेली नाही, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने सदर अनधिकृत बांधकाम निष्कासित करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.रामदास कदम (०२-०१-२०१९) :** (१) हे खरे आहे.
(२) हे खरे नाही.

(३) अनधिकृत बांधकामधारकाने केलेली बांधकामे न हटविलेने उपविभागीय अधिकारी, कणकवली यांनी अनधिकृत बांधकामधारकांना नोटीसा देवून पर्यावरण संरक्षण कायदा, १९८६ व सीआरझेड अधिसूचना, १९९१ व २०११ मधील कायदेशीर तरतुदीची पडताळणी करुन संबंधितांविरुध्द मा.दिवाणी न्यायाधीक्ष व न्यायदंडाधिकारी वर्ग १ देवगड यांच्या न्यायालय रे.के.नं. १/२०१८, दिनांक २९/०१/२०१८ अन्वये फिर्याद दाखल केलेली आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## गेवराई (जि.बीड) येथे तूर खरेदीमध्ये गैरव्यवहार झाल्याबाबत

**(२७) ३७६२१ (३०-०१-२०१८). श्री.धनंजय मुंडे, श्री.सतिश चव्हाण, श्री.विक्रम काळे :** सन्माननीय **पणन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) गेवराई (जि.बीड) येथील महाराष्ट्र राज्य को.ऑप.मार्केटिंग फेडरेशन व त्यांचे सब एजेन्ट बीड जिल्हा कृषी औद्योगिक सर्व सेवा सहकारी संस्था यांनी बीड शासकीय धान्य खरेदी केंद्रांवर हमी भावाने खरेदी केलेल्या सुमारे १२१.५१ क्विंटल तूर खरेदीची देयके संबंधित शेतकऱ्यांना न देता अपहार केल्याची तक्रार लोकप्रतिनिधींनी दिनांक १३ नोव्हेंबर, २०१७ रोजी व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र स्टेट को-ऑप मार्केटिंग फेडरेशन, मुंबई यांचेकडे केली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी जिल्हा निबंधक, बीड यांनी दिनांक १६ नोव्हेंबर, २०१७ रोजीच्या पत्रानुसार सहायक निबंधक, गेवराई यांना चौकशीचे आदेश दिले असले तरी तक्रारदारांचा कोणताही अभिप्राय न घेता वस्तुनिष्ठ चौकशी न केल्याने मा.राज्यमंत्री, पणन यांनी हिवाळी अधिवेशनात जिल्हा उपनिबंधक, बीड व तहसिलदार गेवराई यांच्या मार्फत चौकशी करण्याचे आश्वासन दिले आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, सन २०१६-२०१७ मध्ये विक्री केलेल्या तुरीची देयके वाटप न केल्याची तक्रार करणारे शेतकरी व महिला शेतकरी यांचेवर सब एजेन्ट संस्थेने दिनांक ४ ऑक्टोबर, २०१७ रोजी वा त्यासुमारास फसवणुकीचे गुन्हे दाखल करण्याची लेखी धमकी दिली आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, नाफेड व संबंधित संस्थेकडून निधी प्राप्त झाल्यानंतरसुद्धा शेतकऱ्यांना जाणीवपूर्वक तुरीची देयके देण्यास विलंब करणाऱ्या सर्व बीड जिल्हा कृषी औद्योगिक सेवा सहकारी संस्था लि.बीड यांची चौकशी करुन यात दोषी असलेल्यांवर व गुन्हे दाखल करण्याची धमकी देणाऱ्या अधिकाऱ्यांच्या विरोधात शासनाने कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुभाष देशमुख (२७-१२-२०१८)** : (१) होय.

(२), (३) व (४) होय.

मा.राज्यमंत्री (पणन) यांनी दिलेल्या आश्वासनाच्या अनुषंगाने जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, बीड व तहसिलदार, गेवराई, बीड यांनी ७ शेतकरी सबएजन्ट संस्था व इतर सर्व संबंधितांची सुनावणी घेऊन चौकशी अहवाल सादर केला आहे. सदर चौकशी अहवाल पुढील योग्य त्या कार्यवाहीस्तव दिनांक २५/१०/२०१८ रोजी पणन महासंघाकडे पाठविण्यात आला आहे.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## परिचर्या संवर्गातील शिक्षकांच्या न्याय मागण्यांबाबत

**(२८) ३७८७४ (०४-०४-२०१८). श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले :** सन्माननीय **वैद्यकीय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) परिचर्या संवर्गातील शिक्षकांच्या न्याय मागण्यांबाबत नागपूर विभागाच्या लोकप्रतिनिधींनी दिनांक २१ एप्रिल, २०१७ रोजी वा त्यासुमारास शासनास निवेदन देऊन त्यांच्या ७ न्याय मागण्या निकाली काढण्याची विनंती केली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीष महाजन (२७-११-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) व (३) निवेदनातील मुद्यांवर शासनस्तरावरून कार्यवाही करण्यात येत आहे.

तसेच काही मुद्यांचा प्रस्ताव संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन यांचेकडून मागविण्यात आला आहे.

---

## अमरावती विभागातील भूमिअभिलेख कार्यालयातील रिक्त पदे भरण्याबाबत

**(२९) ३८७५८ (०५-०४-२०१८). श्री.गोपिकिशन बाजोरीया :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) अमरावती विभागातील अकोला, वाशिम व बुलढाणा जिल्हयातील भूमिअभिलेख कार्यालयातील लिपिक व इतर तांत्रिक पदे मोठ्या प्रमाणावर रिक्त आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर रिक्त पदांमुळे कार्यालयातील कामकाजावर परिणाम होत असून सर्वसामान्य नागरिकांनी व शेतकऱ्यांनी त्यांच्या जमिनीच्या मोजणीसाठी केलेले अर्ज प्रलंबित असल्याचे निदर्शनास आले, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, अकोला जिल्हयाचे भूमिअभिलेख कार्यालयाच्या शहरी व ग्रामीण भागामध्ये विभाजन करण्याचा प्रस्ताव शासनाकडे प्रलंबित आहेत, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (२३-०१-२०१९) :** (१) बुलढाणा, अकोला व वाशिम जिल्हयांमध्ये सदर संवर्गासाठी मंजूर असलेल्या ४१७ पदांपैकी ६७ पदे रिक्त आहेत.

(२) अकोला जिल्ह्यातील १११६, वाशिम जिल्ह्यातील ५५८ आणि बुलढाणा जिल्ह्यातील १५०४ मोजणी प्रकरणे शिल्लक आहेत.
(३) भूमि अभिलेख विभागाच्या अखत्यारित नविन २५ नगर भूमापन कार्यालये निर्माण करण्याचा प्रस्ताव तपासण्यात येत आहे.
(४) वित्त विभागाने सूचित केल्यानुसार सुधारित प्रस्ताव सादर करण्याबाबत जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमिअभिलेख यांना कळविण्यात आले आहे.
(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील दिव्यांग शाळांमध्ये पद भरती करण्याबाबत

**(३०) ३८८७४ (०५-०४-२०१८). डॉ.सुधीर तांबे, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, ॲड.हुस्नबानू खलिफे, श्री.आनंदराव पाटील, ॲड.रामहरी रुपनवर, श्री.सतेज ऊर्फ बंटी पाटील, आर्कि.अनंत गाडगीळ, श्री.सुभाष झांबड, प्रा.जोगेन्द्र कवाडे, श्री.हरिसिंग राठोड, श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.जनार्दन चांदूरकर, श्री.विक्रम काळे, श्री.दत्तात्रय सावंत, श्री.बाळाराम पाटील, श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले, श्री.गिरीशचंद्र व्यास, श्री.प्रविण दरेकर : तारांकित प्रश्न क्रमांक ३५८७० ला दिनांक १५ डिसेंबर, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **सामाजिक न्याय मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मा.उच्च न्यायालय, औरंगाबाद खंडपीठाने अपंगांच्या विशेष शाळा/ कर्मशाळांमधील रिक्त पदे भरण्यापूर्वी अपंग कल्याण आयुक्तालयस्तरावर ठेवलेल्या प्रतिक्षा यादीवरील उमेदवार उपलब्ध करुन देण्याचे निर्देश दिले असून त्यानुसार कार्यवाही करण्यात येते, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, नागपूर सिताबर्डी येथील मातृसेवा संघाच्या सुतिकागृह परिसरात मातृसेवा संघ या सेवाभावी संस्थेतर्फे स्नेहांगण या निवासी दिव्यांग शाळेतील ७० टक्के शिक्षकांची तसेच राज्यातील इतर दिव्यांग शाळांमध्ये मागील अनेक वर्षापासून पद भरती करण्यात आली नसल्याचे माहे जानेवारी, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, दिव्यांगाच्या विशेष शाळांच्या समस्या तसेच अपंग कल्याण योजनांच्या अंमलबजावणीबाबतचे निवेदन लोकप्रतिनिधींनी मा.सामाजिक न्याय मंत्री यांना माहे डिसेंबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान दिले, हे खरे आहे काय,

(४) असल्यास, वित्त विभागाने उक्त पद भरतीसंदर्भात दिलेल्या निर्देशानूसार दिव्यांगांच्या विविध शाळा, कार्यशाळा, वसतिगृहे आणि बालगृहांमधील पद भरतीस सुट देण्याचा शासनाच्या विचाराधीन असलेल्या प्रस्ताव, आकृतिबंधानुसार रिक्त पदे भरणे व इतर मागण्यांबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.राजकुमार बडोले (२१-१२-२०१८) :** (१), (२) व (३) होय.

(४) पद भरती संदर्भात शासनस्तरावर कार्यवाही सुरु आहे.

(५) प्रश्नच उद्‌भवत नाही.

---

## चंद्रपूर येथील दीक्षाभूमीवर भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर भवन उभारण्याबाबत

**(३१) ३९५४० (०५-०४-२०१८). श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, ॲड.हुस्नबानू खलिफे, श्री.आनंदराव पाटील, ॲड.रामहरी रुपनवर, श्री.सुभाष झांबड, श्री.हरिसिंग राठोड, श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.जनार्दन चांदूरकर, डॉ.सुधीर तांबे, श्री.सतेज ऊर्फ बंटी पाटील, श्री.मोहनराव कदम :** सन्माननीय **सामाजिक न्याय मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) चंद्रपूर येथील दीक्षाभूमीवर भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर भवन उभारण्याचा निर्णय माहे मार्च, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान घेण्यात आला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, निर्णयाचे स्वरुप काय आहे व त्यानुसार पुढे कोणती कार्यवाही करण्यात आली आहे, यासाठी किती निधीची आवश्यकता आहे व प्रत्यक्षात किती निधी उपलब्ध करण्यात आला आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.राजकुमार बडोले (२७-११-२०१८) :** (१) होय.
(२) विभागाच्या दिनांक २७/९/२०१७ च्या शासन निर्णयान्वये दीक्षाभूमी, चंद्रपूर येथील डॉ. बाबासाहेब आंबेडकर भवन बांधकाम व परिसराचे सुशोभिकरण यांस निधी उपलब्ध करून देण्यात आला आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मौजे असनिये (ता.सावंतवाडी, जि.सिंधुदुर्ग) येथील दुगसवाडी फाटा ते दलितवस्तीकडे जाणाऱ्या ग्रामपंचायतीच्या रस्त्याबाबत

**(३२) ४०११० (०४-०४-२०१८). श्रीमती विद्या चव्हाण, श्री.हेमंत टकले, श्री.किरण पावसकर :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मौजे असनिये (ता.सावंतवाडी, जि.सिंधुदुर्ग) येथील दुगसवाडी फाटा ते दलितवस्तीकडे जाणाऱ्या ग्रामपंचायतीच्या रस्त्यावर खड्डे खणून काटेरी कुंपण घालुन रस्ता बंद केला असल्याची तक्रार ग्रामस्थांनी तहसिलदार सावंतवाडी यांच्याकडे दिनांक १७ जानेवारी, २०१८ रोजी वा त्यासुमारास केल्याचे निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (१७-०८-२०१८) :** (१) ग्रामपंचायत, असनिये ग्रामस्थांनी दिनांक ०२/०१/२०१८ रोजी तहसिलदार, सावंतवाडी यांचेकडे तक्रार केली आहे.
(२) सदर अतिक्रमणाबाबत वस्तुस्थिती जाणण्यासाठी मंडल अधिकारी, बांदा यांचेमार्फत चौकशी करण्यात आली. सदर चौकशीमध्ये खालीलप्रमाणे आढळून आले.

ग्रामपंचायत न.नं. २३ नुसार हरीजनवाडी दुगसवाडी रस्ता ते हरीजनवाडी पर्यंत जाणारी पायवाट अशी रस्त्याची नोंद आहे. सदर

पायवाटीची लांबी ९० मी. व रूंदी २ मी. एवढी आहे. सद्य:स्थितीत सदरच्या पायवाटेवर कोणत्याही प्रकारचे काटेरी कुंपण व खड्डे मारलेले नाहीत. तसेच सदर रस्ता वाहतुकीसाठी खुला आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राजुरा (जि.वाशिम) येथील आरोग्य उपकेंद्रात सुविधांचा अभाव असल्याबाबत

**(३३) ४०३७७ (०४-०४-२०१८). श्री.हरिसिंग राठोड, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, ॲड.रामहरी रुपनवर, ॲड.हुस्नबानू खलिफे, श्री.आनंदराव पाटील :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राजुरा (जि.वाशिम) येथील आरोग्य उपकेंद्रात सुविधांचा अभाव असून तेथील कर्मचाऱ्यांनी वर्गणी जमा करुन उपकेंद्राच्या मुख्य इमारतीसह कर्मचारी निवासस्थानाची साफसफाई करुन रंग लावला, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर आरोग्य उपकेंद्रातील कर्मचारी कपात करण्यात आली असून कंत्राटी आरोग्य सेविकेच्या नेमणूका करण्यात आल्या असून केवळ कंत्राटी सेविका मुख्यालयी राहतात तर उर्वरित कर्मचारी निवासाची व्यवस्था नसल्याने बाहेरुन ये-जा करतात, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, सदर आरोग्य उपकेंद्रातील कर्मचाऱ्यांची निवासस्थाने जुनी झाल्याने त्यांची दुरवस्था झालेली आहे, हे खरे आहे काय,
(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे, नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. दीपक सावंत (२२-११-२०१८) :** (१) अंशत: खरे आहे.

उपकेंद्र राजुरा, ता.मालेगाव येथे कोणत्याही प्रकारच्या सुविधांचा अभाव नसून उपकेंद्राच्या ठिकाणी आवश्यक असणाऱ्या सर्व सुविधा व कर्मचारी वर्ग उपलब्ध आहे.

उपकेंद्राच्या मुख्य इमारतीच्या रंगरंगोटीचे काम स्वेच्छेने स्थानिक लोकवर्गणीतून करण्यात आले असून त्यामध्ये स्थानिक आरोग्य कर्मचाऱ्यांनी सहभाग घेतलेला आहे.

(२) हे खरे नाही.

राजुरा उपकेंद्रात कर्मचाऱ्यांची कपात केलेली नसून सदर ठिकाणी आकृतिबंधानुसार एक आरोग्य सेविका व एक आरोग्य सेवक अशी दोन पदे मंजूर असून ती भरलेली आहेत. तसेच एका कंत्राटी आरोग्य सेविकेची अतिरिक्त नियुक्ती करण्यात आलेली आहे.

सद्य:स्थितीत मौजे राजुरा येथे एका निवासस्थानाची व्यवस्था असून त्या निवासस्थानात क्लिनिकरूम सह पाच खोल्या आहेत. त्यामध्ये दोन आरोग्य सेविका वास्तव्यास राहत असून आरोग्य सेवक हे स्थानिक उपकेंद्राच्या कार्यक्षेत्रात घर भाड्याने घेऊन राहतात.

(३) हे खरे आहे.

उपकेंद्र व कर्मचाऱ्यांचे निवासस्थानाचे बांधकाम जुने आहे.

(४) नवीन उपकेंद्र इमारत व कर्मचाऱ्यांचे निवासस्थान बांधकाम सन २०१७-१८ मध्ये राष्ट्रीय आरोग्य अभियान मधून प्रस्तावित करण्यात आले आले होते. तथापि, त्यास मंजूरी मिळाली नाही. इमारत बांधकाम दुरूस्तीची कार्यवाही सुरू आहे.

---

## पुणे जिल्ह्यातील धरणाचे पाणी वाटपाचे नियोजन करण्याबाबत

**(३४) ४२४३८ (०१-०८-२०१८). श्री.अनिल भोसले** : सन्माननीय **जलसंपदा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पुणे जिल्ह्यातील विविध धरणाचे पाणी वाटपाचे योग्य नियोजन न केल्यामुळे पाणी प्रश्नावर वाद निर्माण होऊन जिल्ह्यातील शेतीला आवश्यक पाणी मिळत नसल्याने शेती अडचणीत आल्याची बाब माहे एप्रिल, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने पुणे जिल्ह्यातील पाणीवाटपाचे योग्य

नियोजन करुन शेती व नागरी वस्तीला योग्य प्रमाणात पाणी उपलब्ध करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीष महाजन (३०-११-२०१८) :** (१) नाही.

शासन निर्णय क्र. कासस-२०१५/(प्र.क्र. १६२/२०१५)/सिं.व्य.(म), दिनांक १८/०३/२०१६ नुसार कालवा सल्लागार समितीच्या बैठकीतील निर्णयानुसार पाणी वाटप केले जाते.
(२) प्रश्न उद्‌भवत नाही.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## रायगड जिल्हा परिषद कर्मचारी सहकारी पतपेढीमध्ये अवैध नेमणूक केल्याबाबत

**(३५) ४२६८० (०१-०८-२०१८). श्री.सुभाष झांबड :** सन्माननीय **सहकार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) रायगड जिल्हा परिषद कर्मचारी सहकारी पतपेढी मर्यादित, अलिबाग यांचे कार्यालयातील श्रीमती प्रतिभा योगेश देशमुख यांची सेवा शर्ती व अटीमध्ये पात्र नसताना वयाच्या ४१ वर्षी अनधिकृतपणे नेमणूक करण्यात आली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, पतपेढीने नोकर भरतीबाबत कोणतीही जाहिरात न देता श्रीमती प्रतिभा योगेश देशमुख यांची नियमबाहृय नेमणूक करण्यात आली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, याबाबत शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले व त्यानुसार उक्त नियमबाहृय नेमणूक रद्द करणेबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुभाष देशमुख (२७-१२-२०१८) :** (१) नाही.
(२) नाही.
(३) सदर संस्थेने श्रीमती प्रतिभा योगेश देशमुख यांना संचालक मंडळाच्या दिनांक २४/०७/२०१५ च्या ठरावान्वये दिनांक ०१/०८/२०१५ पासून रोजंदारीवर नेमणूक केली होती. तद्नंतर संचालक मंडळाने त्यांच्या दिनांक २७/०२/२०१८ रोजीच्या ठरावानुसार श्रीमती देशमुख यांची शैक्षणिक अर्हता तपासून तसेच संस्थेच्या मंजूर नियमावलीच्या अधिन राहून संस्थेने संबंधितांना कनिष्ठ सहाय्यक या पदावर दिनांक ०१/०३/२०१८ पासून तात्पुरत्या स्वरुपात खुल्या प्रवर्गात नेमणूक दिली आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मागासवर्गीयांच्या औद्योगिक संस्था मदतीच्या प्रतिक्षेत असल्याबाबत

**(३६) ४२७७६ (०१-०८-२०१८). श्री.जगन्नाथ शिंदे :** सन्माननीय **सामाजिक न्याय मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील मागासवर्गीय समाजातील होतकरू मुलांना औद्योगिक संस्था स्थापन करून रोजगाराच्या संधी उपलब्ध व्हाव्यात याकरीता सन २००४ मध्ये राज्य शासनाकडून धोरण तयार करण्यात आले असून सदरहू धोरणानुसार सहकारी तत्वावर संस्था स्थापन करणाऱ्यांना ३५ टक्के दीर्घमुदतीचे कर्ज, ३५ टक्के आर्थिक भागभांडवल, २५ टक्के बँक कर्ज व ५ टक्के स्वत:चा सहभाग या तत्वावर मंजुरी देण्याचा निर्णय घेण्यात आला आहे व यानुसार ३७२ औद्योगिक सहकारी संस्थांच्या प्रस्तावाला मंजुरी देण्यात आली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, प्रत्यक्षात १७२ संस्थांची प्रकरणे मंजूर करुन मंजूर झालेल्या निधीतील अल्प रक्कमच देण्यात आली व उर्वरित थकीत मंजूर रक्कम त्यांना अद्याप दिली नाही, तसेच उर्वरित संस्थाचे प्रस्ताव मंजूर केले नाहीत, इतकेच नव्हे तर राज्य शासनाने या प्रकल्पांना थेट मदत करण्याचा निर्णय बदलत ही योजना बँकेमार्फत राबविण्याचा हेतुपुरस्सर निर्णय घेतला आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, या मागासवर्गीय संस्थांना निधीचे वाटप करण्यासंदर्भात तीन वेळा औरंगाबाद खंडपीठाने आदेश दिल्यानंतरही या संस्थांना शासनाकडून सन २०१४ पासून निधी देण्यात आलेला नाही, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, या प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुसार कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे, नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.राजकुमार बडोले (२१-१२-२०१८) :** (१) हे खरे आहे.
(२) हे अंशत: खरे आहे.
(३) हे खरे नाही.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील शेतकऱ्यांचे कर्ज माफ करण्याबाबत

**(३७) ४२९०६ (०१-०८-२०१८). श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, ॲड.रामहरी रुपनवर, श्री.आनंदराव पाटील, श्री.जनार्दन चांदूरकर, ॲड.हुस्नबानू खलिफे, आर्कि.अनंत गाडगीळ, श्री.सुभाष झांबड, श्री.हरिसिंग राठोड, श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.चंद्रकांत रघुवंशी, प्रा.जोगेन्द्र कवाडे : तारांकित प्रश्न क्रमांक ३८२८३ ला दिनांक १२ मार्च, २०१८ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **सहकार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) दिनांक १ एप्रिल, २००१ ते ३१ मार्च, २००९ या कालावधीतील राज्यातील शेतकऱ्यांची कर्ज माफ करण्याबाबतचा निर्णय शासनाने दिनांक २४ एप्रिल, २०१८ रोजी वा त्यासुमारास घेतला आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, निर्णयाचे स्वरुप काय आहे,
(३) असल्यास, उक्त निर्णयाचा लाभ किती शेतकऱ्यांना होणे अपेक्षित आहे, यासाठी किती निधीची आवश्यकता आहे व या निर्णयाची अंमलबजावणी केव्हापासून करण्यात येणार आहे,
(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुसार कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुभाष देशमुख (०२-०१-२०१९) :** (१) होय.

दिनांक १/०४/२००१ ते दिनांक ३१/०३/२००९ या कालावधीत थकीत असलेले अल्प/मध्यम मुदत शेती कर्जे माफ करण्याचा निर्णय राज्य शासनाने शासन निर्णय दिनांक ९ मे, २०१८ अन्वये घेतलेला आहे.

(२) शासन निर्णय दिनांक ९ मे, २०१८ अन्वये खालील निर्णय घेण्यात आले:-

१. दिनांक १/०४/२००१ ते दिनांक ३१/०३/२००९ पर्यंत उचल केलेल्या पीक / मध्यम मुदत कर्जाची दिनांक ३०/०६/२०१६ रोजी थकीत झालेल्या रकमेतून परतफेड केलेली रक्कम वगळून दिनांक ३१/०७/२०१७ पर्यंत मुद्दल व व्याजासह परतफेड न झालेल्या थकबाकीदार शेतकऱ्यांना अल्प / अत्यल्प भूधारक याप्रकारे जमीन धारणेचे क्षेत्र विचारात न घेता या योजनेच्या पूर्वीच्या निकषाप्रमाणे सरसकट रुपये १.५० लाख पर्यंत कर्जमाफी देण्यात यावी.

२. दिनांक १/०४/२००१ ते दिनांक ३१/०३/२००९ पर्यंत वाटप केलेल्या पीक कर्जापैकी दिनांक ३०/०६/२०१६ पूर्वी किंवा नंतर पुनर्गठन / फेरपुनर्गठन झालेल्या कर्जाचे दिनांक ३१/०७/२०१७ पर्यंत थकीत व उर्वरित हप्ते रुपये १.५० लाखाच्या मर्यादेपर्यंत असल्यास त्याचा या योजनेच्या पुर्वीच्या निकषाप्रमाणे कर्जमाफी योजनेत समाविष्ठ करण्यात यावा.

३. दिनांक १/०४/२००१ ते दिनांक ३१/०३/२०१६ पर्यंत इमूपालन, शेडनेट, पॉलीहाऊस यासाठी मध्यम मुदत कर्ज घेतलेल्या व अशा कर्जापैकी दिनांक ३०/०६/२०१६ रोजी थकीत झालेल्या रकमेतून परतफेड केलेली रक्कम वगळून दिनांक ३१/०७/२०१७ पर्यंतची मुद्दल व व्याजासह परतफेड न झालेल्या थकबाकीदार शेतकऱ्यांचे अल्प / अत्यल्प भूधारक याप्रकारे जमीन धारणेचे क्षेत्र विचारात न घेता या योजनेच्या पूर्वीच्या निकषाप्रमाणे सरसकट प्रति कुटुंब रुपये १.५० लाख पर्यंत कर्जमाफी देण्यात यावी.

४. या योजनेच्या पूर्वीच्या निकषाप्रमाणे वरील प्रकारच्या पीक कर्जाच्या / पुनर्गठन/फेरपुनर्गठन/ मध्यम मुदत कर्जाची थकीत रक्कम तसेच यापुर्वी केलेल्या अर्जाच्या अनुषंगाने पात्र कर्जखाती

रक्कम अशी एकत्रित थकीत रक्कम रुपये १.५० लाखाच्या वर असल्यास एकरकमी परतफेड योजनेनुसार शेतकऱ्यांनी रु १.५० लाखावरील थकीत रक्कम दिनांक ३०/०६/२०१८ पर्यंत भरल्यास त्यांना शासनातर्फे प्रति कुटुंब रुपये १.५० लाख रकमेच्या मर्यादेपर्यंत कर्जमाफीचा लाभ देण्यात यावा.

५. दिनांक १/०४/२००१ ते दिनांक ३१/०३/२००९ या कालावधीतील उपरोक्तप्रमाणे थकीत कर्ज असलेल्या शेतकऱ्यांना सन २००८ आणि सन २००९ मध्ये अनुक्रमे केंद्र व राज्य शासनाने राबविलेल्या कर्जमाफी योजनांचा फायदा मिळाला नसल्याबाबत शेतकरी व संबंधित बँकांकडून घोषणापत्र घेणे बंधनकारक करण्यात यावे.

(३) दिनांक ३१/०७/२०१७ अखेर अंदाजे ३.४९ लाख खातेदारांची मुद्दल व व्याजासह सुमारे रुपये ३१३९ कोटीची थकबाकी असल्याची माहिती राज्यस्तरीय बँकर समितीकडून प्राप्त झाली आहे.

वित्तीय वर्ष २०१८-१९ साठी या योजनेवरील खर्चासाठी शासनाने रुपये ७८९० कोटी आर्थिक निधीची तरतूद करण्यात आलेली आहे.

(४) शासन निर्णय दिनांक ९ मे, २०१८ नुसार पात्र ठरणाऱ्या शेतकऱ्यांना छत्रपती शिवाजी महाराज शेतकरी सन्मान योजनेचा लाभ दिनांक २८ जून, २०१७ आणि त्यानंतर वेळोवेळी काढण्यात आलेल्या शासन निर्णयामधील अटी, शर्ती व निकषांचे अधिन राहून देण्यात येत आहे.

(५) वरील शासन निर्णयानुसार पात्र शेतकऱ्यांना योजनेचा लाभ देण्याची कार्यवाही त्वरीत करण्यात आलेली असल्यामुळे विलंबाचा प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## केंद्र शासनाने शेजारी देशांना उधारीवर साखर विकण्याचे धोरण आखल्याबाबत

**(३८) ४३०६२ (०१-०८-२०१८). श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले, श्री.गिरीशचंद्र व्यास, श्री.प्रविण दरेकर :** सन्माननीय **सहकार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात अतिरिक्त साखरेचा प्रश्न गंभीर असून साखरेचे दर सुधारण्यासाठी साठा कमी पाहिजे यासाठी केंद्र शासनाने बांग्लादेश, नेपाळ व श्रीलंका या शेजारी देशांना उधारीवर साखर विकण्याचे धोरण आखल्याची माहिती राज्य कृषी मुल्य आयोगाच्या अध्यक्षांनी माहे मे, २०१८ च्या दुसऱ्या आठवड्यात कोल्हापूर येथे घेतलेल्या पत्रकार परिषदेत दिली असल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुभाष देशमुख (३१-१२-२०१८) :** (१) होय.

मा.अध्यक्ष, राज्य कृषी मुल्य आयोग यांनी दिनांक ०५/०५/२०१८ ते दिनांक ०८/०५/२०१८ दरम्यान कोल्हापूर येथे पत्रकार परिषद घेतली आहे. सदर पत्रकार परिषदेमध्ये पत्रकारांनी "शेतकऱ्यांच्या ऊसाला भाव नाही" असा प्रश्न विचारला असता मा.अध्यक्ष, राज्य कृषी मुल्य आयोग यांनी "ऊस उत्पादक शेतकऱ्यांना चांगला दर मिळण्यासाठी सर्व पर्याय शासनाकडून तपासले जातील" असे उत्तर दिले. यामध्ये साखरेचा साठा कमी करणेसाठी साखर निर्यातीस प्रोत्साहन देणे, साखर निर्यातीवर अनुदान देणे व शेजारील राष्ट्रांना उधारीवर साखर देता येईल किंवा कसे ? अशा सर्व शक्यताही केंद्र शासनाकडून तपासल्या जातील असे मत मा.अध्यक्ष, राज्य कृषी मुल्य आयोग यांनी व्यक्त केले आहे.

(२) साखरेचे भाव स्थिर राखण्यासाठी आणि पर्यायाने शेतकऱ्यांच्या ऊसाला रास्त व किफायतशीर भाव मिळण्याच्यादृष्टीने केंद्र शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतले आहेत-

१) केंद्र शासनाने दिनांक ०६/०२/२०१८ च्या आदेशान्वये साखर आयातीवरील आयात शुल्क ५० % वरून १०० % इतका वाढविला आहे.

२) केंद्र शासनाने साखर निर्यातीवरील कर दिनांक २०/०३/२०१८ च्या आदेशान्वये रद्द केला आहे.

३) साखरेची किमान विक्री किंमत दिनांक ०७/०६/२०१८ च्या आदेशान्वये रुपये २९/- प्रति किलो इतकी करण्यात आली आहे

४) देशातील साखर उत्पादकांसाठी ३० लाख मे. टन तर राज्यासाठी ११.४३ लाख मे. टन इतका साखर साठा दिनांक १ जूलै, २०१८ ते ३० जून, २०१९ पर्यंत साखर कारखान्यांनी बफर स्टॉक एक वर्षासाठी राखीव ठेवणे बंधनकारक केले आहे.

५) इथेनॉलचे भाव वाढवून सी हेवी मोलॅसेस पासून इथेनॉलचा दर रुपये ४३.४६ प्रति लिटर, बी हेवी मोलॅसेस पासून इथेनॉलचा दर रुपये ५२.४३ प्रति लिटर आणि ऊसाच्या रसापासून निर्मित इथेनॉलचा दर रुपये ५९.१३ प्रति लिटर केलेला आहे.

६) देशासाठी ५० लाख मे.टन साखर निर्यात कोटा तर महाराष्ट्रातील सहकारी साखर कारखान्यांना ९.९२ लाख मे.टन आणि खाजगी कारखान्यांना ५.६६ लाख मे.टन असा एकूण १५.५८ लाख मे.टन कोटा ठरवून दिलेला आहे.

७) केंद्र शासनाकडून २०१८-१९ च्या ऊस गाळप हंगामासाठी साखर निर्यात करणाऱ्या साखर कारखान्यांना ऊस गाळपाच्या प्रति मे. टनासाठी रुपये १३८.८० उत्पादन अनुदान जाहीर केले आहे.

८) महाराष्ट्रातील साखर कारखान्यांना साखर निर्यात वाहतूक अनुदान रुपये २५०० प्रति मे.टन मिळणार आहे.

वरील सर्व निर्णयामुळे राज्यातील साखरेचे भाव स्थिर राहून शेतकऱ्यांच्या ऊसाला रास्त व किफायतशीर दर देणे कारखान्यांना निश्चितच उपयुक्त ठरणार आहे.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## वाडा, विक्रमगड व शहापूर (जि.पालघर) तालुक्यातील उपजिल्हा रुग्णालयातील अधीक्षक पद भरण्याबाबत

**(३९) ४३१३७ (०२-०८-२०१८). श्री.आनंद ठाकूर, ॲड.राहुल नार्वेकर, श्री.ख्वाजा बेग, श्री.हेमंत टकले :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) वाडा, विक्रमगड (जि.पालघर) व शहापूर (जि.ठाणे) तालुक्यातील अनेक रुग्णांना रुग्णसेवा देणाऱ्या उपजिल्हा रुग्णालयात अधीक्षक पद रिक्त आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने सदर रिक्त पद किती कालावधीत भरण्यात येणार आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. दीपक सावंत (१७-११-२०१८) :** (१) हे खरे आहे.

तथापि, पालघर जिल्ह्यातील वाडा हे उपजिल्हा रुग्णालय नसून ३० खाटांचे ग्रामीण रुग्णालय आहे. वाडा ग्रामीण रुग्णालयातील वैद्यकीय अधीक्षक पदाचा अतिरिक्त कार्यभार वरिष्ठ वैद्यकीय अधिकारी यांचेकडे सोपविण्यात आला आहे.

महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ (वेतनश्रेणी रुपये १५६००-३९१०० ग्रेड ५४००) मधील वैद्यकीय अधिकाऱ्यांची तीन पदे मंजूर असून तीनही पदे भरलेली आहेत. तसेच आयपिएचएस अंतर्गत सर्जे-१, स्त्रीरोतज्ञ-१, बधिरीकरणतज्ञ-१ व बालरोगतज्ञ-१ तसेच आरबीएसके अंतर्गत वैद्यकीय अधिकारी-६, ए.एन.एम.-३, औषधनिर्माण अधिकारी-३ व आयुष अंतर्गत वैद्यकीय अधिकारी-३, सिकलसेल तंत्रज्ञ-१, स्टाफनर्स-२, रक्त संकलन तंत्रज्ञ-१ व वाहन चालक-१ अशी एकूण २७ पदे कंत्राटी पध्दतीने भरण्यात आली आहेत. त्यामार्फत रुग्णाना रुग्ण सेवा पुरविण्यात येते.
(२) महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ (वेतनश्रेणी रुपये १५६००-३९१०० ग्रेड ६६००) मधील जिल्हा शल्यचिकित्सक संवर्गातील रिक्त पदे भरण्याची कार्यवाही सुरु आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## पुणे महानगर परिवहन महामंडळ सेवकांची सहकारी पतसंस्था लि.डेक्कन, पुणे या पतसंस्थेच्या अनागोंदी कारभाराबाबत

**(४०) ४३१५६ (०१-०८-२०१८). ॲड.रामहरी रुपनवर, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.शरद रणपिसे, श्री.आनंदराव पाटील, ॲड.हुस्नबानू खलिफे, श्री.सुभाष झांबड, श्री.अमरनाथ राजूरकर, डॉ.सुधीर तांबे, आर्कि.अनंत गाडगीळ, श्री.मोहनराव कदम, श्री.हरिसिंग राठोड, श्री.जनार्दन चांदूरकर, प्रा.जोगेन्द्र कवाडे :** सन्माननीय **सहकार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पुणे महानगर परिवहन महामंडळ सेवकांची सहकारी पतसंस्था लि. डेक्कन, पुणे या पतसंस्थेच्या अनागोंदी कारभाराबाबत सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे यांचेकडे अनेक सभासदांनी माहे डिसेंबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान लेखी तक्रारी दाखल केलेल्या आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर सहकारी पतसंस्थेच्या कारभाराची शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुसार सभासदांना न्याय देण्याच्यादृष्टीने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुभाष देशमुख (२०-११-२०१८) :** (१) अंशत: खरे आहे.

पतसंस्थेचे सभासद श्री.अमीर शेख यांचा सभासदत्व रद्द करण्याच्या अनुषंगाने तक्रार अर्ज दिनांक २०/१२/२०१७ रोजी प्राप्त झाला होता.

(२) श्री.शेख यांचे सभासदत्व रद्द करणेसाठी संस्थेने महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियमाच्या कलम ३५ अन्वये निबंधकांची पूर्व परवानगी घेतली नसल्याने संबंधितांचे सभासदत्व रद्द झाले नसल्याचे जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, पुणे शहर यांनी दिनांक १४/०२/२०१८ रोजी संस्थेस कळविले आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

___

## वाढत्या खर्चामुळे बेजार झालेल्या सेवा संस्थांना सहकार खात्याने एक लाखांपर्यंतचे अनुदान देण्याचा निर्णय घेतल्याबाबत

**(४१) ४३३३६ (०१-०८-२०१८). श्री.प्रविण दरेकर :** सन्माननीय **सहकार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) वाढत्या खर्चामुळे बेजार झालेल्या सेवा संस्थांना आधार देण्याकरीता सहकार खात्याने एक लाखांपर्यंतचे अनुदान देण्याचा निर्णय माहे मे, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान घेतला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, यामुळे कोल्हापूर जिल्ह्यातील निम्म्या सेवा संस्था अनुदानास मुकणार आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, याबाबत शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुसार कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुभाष देशमुख (२१-१२-२०१८) :** (१) अंशत: खरे आहे. अशा आशयाचा शासन निर्णय दिनांक १ ऑगस्ट, २०१७ मध्ये निर्गमित केला आहे.

सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय, दिनांक ०६/०९/२०१४ अन्वये “राज्यातील प्राथमिक कृषी पतपुरवठा सहकारी संस्थांचे सक्षमीकरण करण्यासाठी या संस्थांनी प्रत्येक आर्थिक वर्षात केलेल्या पीक कर्ज वाटपाच्या प्रमाणात अर्थसहाय्य मंजूर करण्यात यावे” असा निर्णय घेतलेला आहे. शासन निर्णय, दिनांक ०६/०९/२०१४ मध्ये नमूद केलेल्या निकषांपैकी शासन निर्णय, दिनांक ०२/०८/२०१७ अन्वये काही निकष वगळण्यात आले आहेत व काही निकष सुलभ करण्यात आले आहेत.

(२), (३) व (४) कोल्हापूर जिल्ह्यामध्ये ३१/०३/२०१७ अखेर १८६० विकास संस्था कार्यरत आहेत. वरील शासन निर्णयातील निकषांच्या अनुषंगाने कोल्हापूर जिल्ह्यातील १२ तालुक्यातील सन २०१४-१५ करीता ८६७ संस्था, सन २०१५-१६ करीता ९०५ संस्था अशा अर्थसहाय्यास पात्र होऊ शकणाऱ्या संस्थांच्या प्रस्तावांची विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था, कोल्हापूर विभाग, कोल्हापूर (लेखापरीक्षण) यांचे मार्फत तपासणी चालू आहे.

---

## ठाणे जिल्ह्यातील दगडखाणी सुरु करण्याबाबत

**(४२) ४३४९६ (०२-०८-२०१८). श्री.अमरिशभाई पटेल : तारांकित प्रश्न क्रमांक ३१४७२ ला दिनांक ३१ जुलै, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) ठाणे जिल्ह्यातील ७० दगडखाणी वर्षभरापासून बंद असल्यामुळे शासनाला कोट्यवधी रुपयाचा तोटा झाल्याचे माहे एप्रिल, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, हरिद लवादाने या बंद दगडखाणींचे मोजणी करण्याचे आदेश दिले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने बंद असलेल्या दगडखाणी सुरु करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (१९-१२-२०१८) :** (१), (२) व (३) ठाणे जिल्ह्यातील नवी मुंबई परिसरातील सिडकोच्या जमिनीवर सिडकोने केलेल्या शिफारशीनुसार आवश्यक कागदपत्रांची पूर्तता करुन ७२ खनिपट्टाधारकांना दिनांक ३०/९/२०१६ पर्यंत खनिपट्टे मंजूर करण्यात आले होते. तद्नंतर शिल्लक गौण खनिजसाठा उचलण्याकरीता दिनांक ३१/३/२०१७ पर्यंत मुदत देण्यात आली होती. सन २०१६-१७ या वित्तीय वर्षामध्ये सदर ७२ खनिपट्टाधारकाकडून शासनास स्वामीत्वधनापोटी रुपये १९,२९,००,०००/- इतकी रक्कम प्राप्त झाली आहे. सदर खनिपट्टे खाणकाम आराखडा व पर्यावरण अनुमती अभावी दिनांक १/४/२०१७ पासून बंद असल्यामुळे सन २०१७-१८ या वित्तीय वर्षामध्ये स्वामित्वधनाद्वारे महसूल शासनास प्राप्त झाला नाही.

मा.राष्ट्रीय हरित लवादाने खाणकाम आराखडा व पर्यावरण अनुमती प्राप्त केल्याशिवाय खाणकामास परवानगी देण्यात येऊ नये असे दिनांक १४/११/२०१७ रोजी निर्देश दिले आहेत.

त्यानुसार महाराष्ट्र गौण खनिज उत्खनन (विकास व विनियमन) नियम, २०१३ मधील तरतूदीनुसार सिडको विभागाकडील भाडेपट्टाकरार,

खाणकाम आराखडा, पर्यावरण अनुमती, महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळाकडील दाखला, खाण सुरक्षाविषयक दाखला व इतर परवानग्या प्राप्त करुन प्रस्ताव जिल्हास्तरीय पर्यावरण आघात मुल्यांकन प्राधिकरण यांचेकडे सादर करण्याची कार्यवाही जिल्हास्तरावर सुरु आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील महामार्गावर महिला प्रवाशांकरीता स्वच्छतागृह बांधण्याबाबत

**(४३) ४३६४३ (०२-०८-२०१८). डॉ.(श्रीमती) नीलम गोऱ्हे :** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील महामार्गावरील प्रवास करणाऱ्या महिला प्रवाशांकरीता सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अखत्यारितर येणाऱ्या महामार्गावर १६० ठिकाणी स्वच्छतागृहांची उभारणी करण्यात येणार असल्याचे मा.सार्वजनिक बांधकाम मंत्री यांनी दिनांक २८ मे, २०१८ रोजी वा त्यासुमारास जाहीर केले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, या स्वच्छतागृहांची बांधणी केव्हापर्यंत पूर्ण होणार आहे, तसेच या स्वच्छतागृहांची देखभाल कशा प्रकारे करण्यात येणार आहे,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (३१-१२-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) व (३) या स्वच्छतागृहांची उभारणी व देखभाल दुरुस्ती केंद्र शासनाचे सार्वजनिक उपक्रम, खाजगी कंपन्या, बँका, वित्तीय संस्था तसेच सेवाभावी संस्था यांचेमार्फत राज्यातील रस्त्यांच्या लगत करण्याचे नियोजन असून काही ठिकाणी स्वच्छतागृहे बांधण्याचे काम प्रगती पथावर असून, उर्वरीत अन्य ठिकाणी जागा निश्चित करण्याची कार्यवाही प्रगतीपथावर आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## कोयना-कृष्णा नदीकाठावर अवैध वाळू उपसा रोखण्याबाबत

**(४४) ४३६८५ (०२-०८-२०१८). श्री.धनंजय मुंडे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.शरद रणपिसे, ॲड.हुस्नबानू खलिफे, ॲड.रामहरी रुपनवर :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) कोयना-कृष्णा नदीकाठावर दोन्ही बाजूनी अनेक ठिकाणी नदीकिनाऱ्यावरील गाळ मिश्रित वाळू या नावाखाली शासनाच्या योजनेचा गैरफायदा घेऊन अनधिकृतपणे व विनापरवाना गाळ मिश्रित वाळू उपसा राजरोसपणे सुरु असल्याची बाब माहे मे, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने संबंधितांविरुध्द कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (१९-१२-२०१८) :** (१) व (२) सातारा जिल्ह्यात कोयना-कृष्णा नदी किनाऱ्यालगत माती मिश्रित वाळूचे उत्खनन करण्यास जिल्हाधिकारी, सातारा यांचेकडून १५ प्रकरणास परवानगी देण्यात आली होती. त्यापैकी काही परवानाधारकांनी विहित वेळेतनंतर मातीमिश्रित वाळूचे उत्खनन करुन वाहतूक करणे, मातीमिश्रीत वाळू वाहतूकीसाठी जास्त वाहनांचा वापर करणे, हिशोबाची नोंदवही न ठेवणे व ठरवून दिलेल्या परिमाणांपेक्षा अधिक खोल उत्खनन केले असल्याचे निदर्शनास आल्याने ०९ परवाने मुदतपूर्व रद्द करण्यात आले आहेत. तसेच परवान्याच्या वेळी भरलेली एकूण अनामत रक्कम जप्त करण्यात आली आहे.

दिनांक ६/६/२०१८ रोजी मौजे कामेरी, ता.जि.सातारा येथे कृष्णा नदीपात्रातून वाळूचे अनधिकृत उत्खनन करताना १ जे.सी.बी. व ४ ट्रॅक्टर आढळून आल्याने संबंधिताविरुध्द महाराष्ट्र जमीन महसूल अधिनियम, १९६६ चे कलम ४८(७) व (८) नुसार दंडात्मक कारवाई तसेच पोलीस ठाणे, बोरगांव येथे गुन्हा नोंद करण्यात आला आहे. तसेच मौजे सुपने, ता.कराड येथील एका शेतकऱ्याचा परवाना मुदतपूर्व रद्द करुनही कृष्णा नदीकाठावर वाळूचा

उपसा करीत असल्याचे निदर्शनास आल्याने कराड तालुका पोलीस ठाणे येथे भा.दं.वि.सं.कलम ३७९, ३४ अन्वये दिनांक २९/७/२०१८ रोजी गुन्हा दाखल करण्यात आला आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## अमळनेर (जि.जळगांव) शहर बाह्यवळण रस्त्याच्या निर्मितीबाबत

**(४५) ४३८४७ (०२-०८-२०१८). श्रीमती स्मिता वाघ : तारांकित प्रश्न क्रमांक ४०१८७ ला दिनांक ८ मार्च, २०१८ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) अमळनेर (जि.जळगांव) येथे मेहेरगांव-धुळे-अमळनेर-चोपडा-खरगोन रस्ता रा.मा.१५ वरील अमळनेर शहरानजीक बाह्यवळण मार्गाची निर्मित होणेबाबत प्रस्ताव प्रलंबित असल्याचे निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर बाह्यवळण मार्गासाठी आवश्यक भूसंपादनासाठी निधी उपलब्ध नाही, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने सदर बाह्यवळण मार्ग निर्मिती होणेबाबत तसेच आवश्यक निधी उपलब्ध होणेबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (१६-११-२०१८) :** (१) होय. हे खरे आहे.
(२) व (३) हे खरे नाही.
सदर भूसंपादनासाठी निधी कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, अमळनेर यांचेमार्फत जिल्हाधिकारी, जळगाव यांचेकडे सन २०१२ मध्ये वर्ग करण्यात आलेला आहे. पूर्वीच्या भूसंपादन कायद्यानुसार सादर झालेला भूसंपादन प्रस्ताव व्यपगत झाला असून भूमीसंपादन, पुनर्वसन व पुनर्स्थापना करताना वाजवी भरपाई मिळण्याचा व पारदर्शकतेचा हक्क

अधिनियम, २०१३ या नविन कायद्यानुसार भूसंपादनाचा प्रस्ताव फेरसादर करण्याची कार्यवाही सुरू आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## आमगाव (ता.वाडा, जि.पालघर) येथील आश्रमशाळेच्या नवीन इमारतीच्या प्रस्तावाला मंजुरी देण्याबाबत

**(४६) ४६४०६ (०५-१२-२०१८). श्रीमती विद्या चव्हाण :** सन्माननीय **आदिवासी विकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) आमगांव (ता.वाडा, जि.पालघर) येथील आदिवासी विद्यार्थ्यांची गैरसोय होत असल्याने दिनांक १५ जून, २००६ रोजी वा त्यासुमारास जव्हार आदिवासी विकास प्रकल्पाकडून मंत्रालयात मंजूरीसाठी पाठविलेल्या आश्रमशाळेच्या नवीन इमारतीच्या प्रस्तावाला मंजूरी देण्यात यावी अशी मागणी 'समर्थन' संस्थेने दिनांक ५ सप्टेंबर, २०१८ रोजी वा त्यासुमारास मा.मंत्री, आदिवासी विकास, सचिव, आदिवासी विकास व अप्पर आयुक्त, आदिवासी विकास यांचेकडे निवेदनाद्वारे केली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, निवेदनाच्या अनुषंगाने प्रस्तावावर आतापर्यंत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विष्णु सवरा (०१-०१-२०१९) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) व (३) शासन ज्ञापन, दिनांक ०८ ऑक्टोबर, २०१८ अन्वये शासकीय आश्रमशाळा, आमगांव, ता.वाडा, जि.पालघर येथील शालेय इमारत व मुलींचे वसतिगृह इमारत बांधकामाचे अंदाजपत्रक व आराखडे यांना प्रशासकीय मान्यता देण्यात आली असून मार्च २०१९ मधील अर्थसंकल्पात निधीची तरतूद झाल्यानंतर बांधकाम सुरु करण्याचे नियोजन आहे.

---

## मुंबईतील गिरगांव चौपाटीवर मेक इन इंडिया कार्यक्रमाच्या आयोजकावर व कंत्राटदारांवर कारवाई करण्याबाबत

**(४७) ४६४४४ (०५-१२-२०१८). श्री.जनार्दन चांदूरकर :** सन्माननीय **उद्योग मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबईतील गिरगांव चौपाटीवर सन २०१६ मध्ये आयोजित करण्यात आलेल्या मेक इन इंडिया कार्यक्रमाच्या आयोजकावर व कंत्राटदारांवर कारवाई करणार का असा प्रश्न मा.उच्च न्यायालयाने राज्य शासनाला विचारला असून याबाबत तीन आठवड्यात उत्तर देण्याचे निर्देश देण्यात आल्याचे माहे ऑगस्ट, २०१८ च्या पहिल्या आठवड्याच्या निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, याबाबतचा तपशील काय आहे तसेच उक्त कार्यक्रमाच्या आयोजकांवर व कंत्राटदारावर कारवाई करण्याबाबत शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुंषगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुभाष देसाई (२१-१२-२०१८) :** (१) हे खरे आहे.

(२) दिनांक १३ ते १८ फेब्रुवारी, २०१६ रोजी मुंबई येथे मेक इन इंडिया कार्यक्रम Department of Industrial Policy & Promotion, Government of India यांचे अखत्यारित होता.संबंधित कार्यक्रमाकरीता महाराष्ट्र शासन यजमान म्हणून काम पाहत होते या कार्यक्रमाची रुपरेखा व आखणी करण्याकरीता महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळातर्फे Confederation of Indian Industry (CII) या संस्थेशी सामंजस्य करार करण्यात आला होता.

मेक इन इंडिया कार्यक्रमांतर्गत दिनांक १४ फेब्रुवारी, २०१६ रोजी गिरगांव चौपाटी येथे संगित रजनी सांस्कृतिक कार्यक्रम CII मार्फत आयोजित करण्यात आला होता.सदर कार्यक्रमाच्या दरम्यान स्टेजला आग लागल्याने दुर्घटना घटली. गिरगांव चौपाटी वरील घटने संदर्भात दाखल गुन्हयाचा तपास पूर्ण होऊन गुन्हयामध्ये दोषारोपपत्र न्यायालयामध्ये दाखल

करण्यात आले आहे. हे प्रकरण सध्या न्यायप्रविष्ट आहे. सदर कार्यक्रमाकरीता Confederation of Indian Industry (CII) यांनी प्रस्तावित केलेल्या खर्चापैकी ५०% रक्कम सदर कार्यक्रमादरम्यान दुर्घटना घडल्यानंतर राखून ठेवण्यात आली आहे. न्यायालयाने दोषी ठरविल्यास ५०% रक्कम जप्त करणे व भविष्यात कंत्राटदारास काळया यादीत समाविष्ट करुन त्यास कोणतेही काम विभागामार्फत देण्यात येणार नाही.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## शिक्षणाधिकारी (प्राथमिक/माध्यमिक) जिल्हा परिषद नांदेड यांनी नवीन नियुक्तांना मान्यता देण्यावर बंदी असताना नियमबाह्यरित्या मान्यता दिल्याबाबत

**(४८) ४८८२५ (१५-०१-२०१४). श्री.नागोराव गाणार :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) अनुदानित शाळामधील शिक्षकांच्या नवीन नियुक्यांबाबत दिनांक २ मे, २०१२ च्या शासन निर्णयानुसार मान्यता देण्यावर बंदी घालण्यात आली, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, मान्यता देण्यावर बंदी घातली असताना सुध्दा शिक्षणाधिकारी (प्राथमिक/माध्यमिक) जिल्हा परिषद, नांदेड यांनी भ्रष्टाचार करुन जुन्या तारखा टाकून अनेक मान्यता प्रदान केल्या आहेत, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी श्री.आर.के.मुधोळकर, नांदेड यांनी वारंवार पुराव्यासह तक्रारी केल्या असूनही फक्त कागदोपत्री कारवाई केल्याचे दाखवून अद्यापपर्यंत दोषीविरुध्द कारवाई करण्यात आली नाही, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी दोषी अधिकाऱ्यांविरुध्द कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहेत,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१५-१२-२०१८) :** (१), (२), (३), (४) व (५) दिनांक २ मे, २०१२ च्या शासन निर्णयान्वये नवीन शिक्षक नियुक्त करण्यापूर्वी अतिरिक्त

शिक्षक कार्यरत नसल्याची खात्री करण्याच्या सूचना देण्यात आलेल्या होत्या. अयोग्य वैयक्तिक मान्यतेच्या प्रकरणांबाबत आयुक्तालय स्तरावरुन कार्यवाही सुरु आहे.

---

## राज्यातील मराठी, हिंदी आणि इंग्रजी माध्यमाच्या अनुदानित शाळांमधील रिक्त जागांवर नेमणुका झालेल्या शिक्षणसेवकांना सांकेतांक मिळण्याबाबत

**(४९) ४८८९९ (०५-०७-२०१४). श्री.कपिल पाटील : तारांकित प्रश्न क्रमांक ४५८८२ ला दिनांक १० डिसेंबर, २०१३ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील मराठी, हिंदी आणि इंग्रजी माध्यमाच्या अनुदानित शाळांमधील रिक्त जागांवर नेमणुका झालेल्या शिक्षणसेवकांना शिक्षणनिधी कार्यालयाकडून अद्याप कर्मचारी सांकेतांक मिळालेला नसल्यामुळे गेल्या दोन वर्षापासून शिक्षणसेवक विनावेतन काम करित असल्याचे माहे मे, २०१३ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, दिनांक २ मे, २०१२ रोजीच्या शासन निर्णयानुसार केलेल्या पटपडताळणी अहवालाच्या अनुषंगाने समायोजनाची कार्यवाही पूर्ण झालेली आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, शिक्षण सेवकांना वेतन मिळण्यासाठी वैयक्तिक मान्यता देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०५-१२-२०१८) :** (१) शालार्थ प्रणालीमध्ये नव्याने नाव समाविष्ट करण्यासाठी दिनांक २८/०२/२०१८ व २२/०५/२०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये आयुक्त, शिक्षण यांच्या अध्यक्षतेखाली विशेष कृती दल स्थापन करण्यात आलेले आहे.

(२) पटपडताळणी अहवालाच्या अनुषंगाने समायोजनाची कार्यवाही सुरु आहे.

(३) शिक्षकांना वैयक्तिक मान्यता देण्याबाबत शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णयानुसार कार्यवाही केली जात आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यात दरवर्षी वाढणारी विद्यार्थी संख्या आणि महागाई यामुळे राज्य शिक्षण मंडळ आर्थिक संकटात सापडल्याबाबत

**(५०) ४९११५ (०५-०७-२०१४). श्री.विनायकराव मेटे, श्री.अनिल भोसले, श्री.हेमंत टकले, श्री.किरण पावसकर, श्री.धनंजय मुंडे, श्री.सतिश चव्हाण :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यात दरवर्षी वाढणारी विद्यार्थी संख्या आणि महागाई यामुळे राज्य शिक्षण मंडळ आर्थिक संकटात सापडले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, आर्थिक संकटात सापडलेल्या राज्य शिक्षण मंडळाला आर्थिक संकटातून बाहेर काढणेबाबत शासनाने कोणती उपाययोजना केली वा करण्यात येत आहे,
(३) अद्याप कोणतीच उपाययोजना केली नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीश बापट (२०-११-२०१८) :** (१) हे खरे नाही.
(२) व (३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**विधान भवन :**
**मुंबई.**

**जितेंद्र भोळे**
**सचिव (कार्यभार),**
**महाराष्ट्र विधानपरिषद.**

---

मुद्रणपूर्व सर्व प्रक्रिया महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालयाच्या संगणक यंत्रणेवर करण्यात आली आहे.
मुद्रण: शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई.